क्रीडा विद्यापीठ व क्रीडा अकादमी - निधी
वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्रीडायो-२३१७/प्र.क्र.७७/क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ ऑगस्ट, २०१७.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक:शाशिम-१०९५/प्र.क्र.१६६/क्रीयुसे-३, दिनांक १८ नोव्हेंबर, १९९५.
२) सहाय्यक संचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्रमांक:निविप्र/.../२०१७-१८/(५)/का-११/२९९, दिनांक ०१ जुलै, २०१७.

**प्रस्तावना :-**

राज्यात शारिरीक शिक्षण व क्रीडा यांचा दर्जा उंचविण्यासाठी राज्यात क्रीडा विद्यापीठ स्थापन करण्याचा पहिला टप्पा म्हणून पुणे येथील शिवछत्रपती क्रीडानगरी येथे मध्यवर्ती क्रीडा केंद्र व राज्यातील वेगवेगळया १४ ठिकाणी क्रीडा प्रबोधिनी स्थापन करण्यास संदर्भाधिन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. या योजनेसाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात रु.१२००.०० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आलेली आहे. सदर तरतूदीपैकी रु.६४०.०० लक्ष इतकी तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

क्रीडा विद्यापीठाची स्थापना या योजनेतर योजनेकरीता सन २०१७-१८ या वर्षाकरिता रु.१२००.०० लक्ष अर्थसंकल्पीत आहे. त्यापैकी रु.६४०.०० लक्ष तरतूद वितरीत करण्यास व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१७-१८ मध्ये क्रीडा विद्यापीठाची स्थापना याकरीता उपलब्ध झालेल्या रु.१२००.०० लक्ष एवढया तरतुदी मधून निधी वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा

विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (३३) क्रीडा विद्यापीठ व क्रीडा अकादमी, (३३) (०१) क्रीडा विद्यापीठाची स्थापना (२२०४ २०६४), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखालील सन २०१७-१८ वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

४. वित्त विभागाच्या दिनांक २४.०७.२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

४.१) वित्त विभागाच्या दिनांक ३०.०६.२०१७ च्या शासन परिपत्रकान्वये ७०% निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत

४.२) सन २०१७-१८ या वर्षाकरिता क्रीडा विद्यापीठाची स्थापना याकरिता चालू आर्थिक वर्षात रु.१२००.०० लक्ष अर्थसंकल्पीत आहे.

४.३) यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

४.४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

४.५) दिनांक २४.०७.२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

४.६) उपरोक्त परिपत्रकातील "अ" व "ब" ची पूर्तता होत आहे.

५. वित्त विभाग दिनांक १८.०४.२०१७ व दिनांक २४.०७.२०१५ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, विभागीय उपसंचालक, औरंगाबाद, जिल्हा क्रीडा अधिकारी, ठाणे, सांगली, कोल्हापूर, नागपूर, अमरावती, गडचिरोली, नाशिक, अहमदनगर, अकोला यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १८.०४.२०१७ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र.१, २, ३, ४, ५, ६ व ७ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८२४१२५७०६३६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=862038e0fbcf90998980c1f9241c4bdd9f61a60c9a06a5fe43c17f10b41e85f5, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2017.08.24 12:46:22 +05'30'

**( कि. ल. संखे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
४. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
७. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)
८. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
९. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१०. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. निवड नस्ती (क्रीयुसे-१)